**मौजे कापशी, ता.कागल, जि.कोल्हापूर येथे सरसेनापती संताजी घोरपडे यांचे स्मारक बांधकामासाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्मारक-२०२०/प्र.क्र.७७/योजना-११**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक :- २८ मार्च, २०२४.

<u>वाचा :</u>

१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.स्मारक-२०१६/प्र.क्र.०३/पंरा-९, दिनांक ११ ऑगस्ट, २०१६.
२) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.स्मारक-२०२०/प्र.क्र.७७/योजना-११, दि.२८.०२.२०२०.
३) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.स्मारक-२०२०/प्र.क्र.७७/योजना-११, दि.२४.०६.२०२१.
४) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.स्मारक-२०२०/प्र.क्र.७७/योजना-११, दि.३०.०३.२०२२.
५) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.स्मारक-२०२०/प्र.क्र.७७/योजना-११, दि.३१.०५.२०२२.
६) जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे पत्र दि.१६.१०.२०२३.

<u>प्रस्तावना :</u>

सरसेनापती संताजी घोरपडे यांचे मौजे कापशी ता.कागल जि.कोल्हापूर येथे स्मारक उभारण्यासाठी जिल्हाधिकारी, कोल्हापूर कार्यालयाने सादर केलेल्या अंदाजपत्रक व आराखड्यास विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील दि.२४.०६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये रु.६७५.७१ लक्ष (रु. सहा कोटी पंचाहत्तर लक्ष एकाहत्तर हजार फक्त) किंमतीची प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर स्मारकासाठी संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये रु.५० लक्ष व संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये रु.२.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी,कोल्हापूर यांनी सादर केले आहे तसेच उर्वरित कामासाठी रु.४२५.७१ लक्ष निधी वितरीत करण्याची विनंती संदर्भ क्र.६ येथील पत्रान्वये केली आहे. त्याअनुषंगाने सदर स्मारक बांधकामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u>

सन २०२३-२०२४ करिता लेखाशीर्ष-मागणी क्रमांक-एल-३, २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९६ जिल्हा परिषदांना/जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय (००) (०६) थोर व्यक्तींची स्मारके उभारण्याकरिता अनुदान (२५१५२४८६), ३१ सहायक अनुदान (योजनांतर्गत) या लेखाशीर्षातर्गत रुपये २०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. या लेखाशीर्षाखाली वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या निधीतून मौजे कापशी ता.कागल जि.कोल्हापूर येथे सरसेनापती संताजी घोरपडे यांचे स्मारक बांधकामासाठी प्रशासकीय मान्यतेपैकी उर्वरित संपूर्ण रक्कम रु.४,२५,७१,०००/- (रु. चार कोटी पंचवीस लक्ष एकाहत्तर हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर स्मारकाच्या बांधकामावरील खर्च भागविण्याकरिता जिल्हा नियोजन अधिकारी, कोल्हापूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना नियंत्रक अधिकारी

म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर स्मारकावरील खर्चाची जबाबदारी जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांची राहील. त्यांनी सदर स्मारकाचे बांधकाम कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर यांच्याकडून करुन घेण्याची कार्यवाही करावी. तसेच स्मारकाच्या कामाची प्रगती तसेच उपयोगिता संबंधिची माहिती, उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास सादर करावे व महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाच्या ताळमेळाबाबतची कार्यवाही करावी. तसेच विहीत कालावधीत निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

३. सदर स्मारकाच्या बांधकामावर नियंत्रण ठेवण्याची व कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही याबाबतची जबाबदारी जिल्हास्तरीय स्मारक समितीची राहील.

४. सदरहू खर्च सन २०२३-२४ करिता लेखाशीर्ष-मागणी क्रमांक-एल-३, २५१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम, १९६ जिल्हा परिषदांना / जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय (००) (०६) थोर व्यक्तींची स्मारके उभारण्याकरिता अनुदान (२५१५२४८६), ३१ सहायक अनुदान (योजनांतर्गत) या लेखाशीर्षांतर्गत प्राप्त अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२५/१४४४, दिनांक १९.०३.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४५/२०२४/व्यय-१५ दि. २२.०३.२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ मधील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२८१३०५२७७८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.03.28 15:17:17 +05'30'

**( का.गो.वळवी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,

३. मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.पालकमंत्री, कोल्हापूर जिल्हा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८. सर्व मा.विधान परिषद सदस्य / मा.विधानसभा सदस्य,
९. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
१०. मा.प्र.स.(ग्राम विकास विभाग), बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई-१,
११. मा.अ.मु.स.सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१२. मा.अ.मु.स.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१३. मा.प्र.स.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१४. मा.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१५. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
१६. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे,
१७. जिल्हाधिकारी, कोल्हापूर,
१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर,
१९. जिल्हा नियोजन अधिकारी, कोल्हापूर,
२०. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर,
२१. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर,
२२. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर,
२३. वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई,
२४. नियोजन विभाग (कार्या.१४४४), मंत्रालय, मुंबई,
२५.कक्ष अधिकारी, वित्त-१ कार्यासन, ग्राम विकास विभाग,
२६. निवड नस्ती (यो-११). ग्राम विकास विभाग.